**बी.एससी (गृह विज्ञान), बी.एससी (ऑनर्स) गृह विज्ञान व बी.एससी (ऑनर्स) सामुदायिक विज्ञान**
**<u>ह्या सर्व पदव्या एकच असल्याबाबत...</u>**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मकृप-१०२३/प्र.क्र.२९४/७-अे,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार,मुंबई - ४०००३२.
दिनांक: १३/०२/२०२५.

**संदर्भ:-** १) कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र.आकृवि-१२११/प्र.क्र.२०८/१५ ए, दि.०७ सप्टेंबर, २०११.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.मकृप-१०२१/प्र.क्र.६३/७-अे, दि.२२/०४/२०२१.
३) उप महानिदेशक (कृषि शिक्षा), भारतीय कृषि अनुसंधान परिषद,नवी दिल्ली यांचे पत्र दि.०६.१२.२०२१.
४) सहायक महानिदेशक (शिक्षा गुणवत्ता आश्वासन और सुधार),भारतीय कृषि अनुसंधान परिषद,नवी दिल्ली यांचे पत्र दि.१४.०२.२०२४.

**<u>प्रस्तावना</u>:-**

उपरोक्त संदर्भ क्र.०१ येथील शासन निर्णयान्वये कृषि विद्यापीठांतर्गत बी.एससी (कृषि जैवतंत्रज्ञान), बी.एससी (कृषि व्यवसाय व्यवस्थापन), बी.एससी (गृह विज्ञान), बी.टेक (अन्नतंत्र), बी.एफ.एससी. (मत्स्य विज्ञान), बी.एससी (उद्यानविद्या) ह्या पदव्या बी.एससी (कृषि)/बी.टेक (कृषि अभियांत्रिकी) व तत्सम पदव्याशी समतुल्य ठरविण्यात आलेल्या आहेत. तसेच, उपरोक्त संदर्भ क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये बी.एससी (ऑनर्स) उद्यानविद्या, बी.एससी (ऑनर्स) वनविद्या, बी.एससी (ऑनर्स) सामाजिक विज्ञान, बी.एससी (ऑनर्स) कृषि व्यवसाय व्यवस्थापन, बी.एफ.एससी (मत्स्य विज्ञान), बी.टेक (कृषि अभियांत्रिकी), बी.टेक (अन्नतंत्रज्ञान) व बी.टेक (जैवतंत्रज्ञान) या संलग्न पदव्या बी.एससी (ऑनर्स) कृषि पदवीशी समतुल्य ठरविण्यात आलेल्या आहेत.

भारतीय कृषि अनुसंधान परिषद, नवी दिल्ली यांच्या पाचव्या अधिष्ठाता समितीच्या शिफारशी चारही कृषि विद्यापीठांना लागू करण्यात आल्या आहेत. भारतीय कृषि अनुसंधान परिषद, नवी दिल्ली यांनी बी.एससी (ऑनर्स) गृह विज्ञान B.Sc.(Hons.) Home Science या पदवीचे नामाभिधान बी.एससी (ऑनर्स) सामुदायिक विज्ञान B.Sc.(Hons.) Community Science असे केले आहे. तसेच, पदवी नामाभिधानामध्ये (Nomenclature) बदल झाला असला तरी या अभ्यासक्रमाच्या पदवीधारक विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण, भरती प्रक्रिया तसेच, केंद्र व राज्याच्या विविध स्पर्धा परीक्षा, बँकिंग परीक्षा देण्यासाठी समान संधी मिळून पात्र ठरविले जाईल, असेही उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील दि.०६/१२/२०२१ च्या पत्रान्वये उप महानिदेशक, भारतीय कृषि अनुसंधान परिषद,नवी दिल्ली यांनी सर्व राज्यांना कळविले होते.

त्यानंतर महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांनी दि.२८/१२/२०२३ च्या पत्रान्वये बी.एससी (ऑनर्स) गृह विज्ञान/बी.एससी (ऑनर्स) सामुदायिक विज्ञान ह्या दोनही पदव्या केवळ नामाभिधानामुळे (Nomenclature) वेगवेगळया दिसत असल्या तरी त्या एकच असल्याचे संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय,मुंबई यांना कळवून आरोग्य संचालनालयातील आहारतज्ञ या पदासाठी पात्र ठरविण्याबाबत शासनस्तरावरुन कळविण्यात यावे, अशी विनंती केली होती.

त्यानुसार दि.२८/१२/२०२३ च्या या विभागाच्या पत्रान्वये भारतीय कृषि अनुसंधान परिषद, नवी दिल्ली यांचे अभिप्राय घेण्याबाबत महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांना कळविण्यात आले होते. संदर्भ क्र.४ येथील भारतीय कृषि अनुसंधान परिषद,नवी दिल्ली यांच्या दि.१४/०२/२०२४ च्या पत्रान्वये त्यांचे अभिप्राय प्राप्त झाले होते. त्यानुसार बी.एससी (ऑनर्स) गृह विज्ञान या पूर्वीच्या पदवीसाठी बी.एससी (ऑनर्स) सामुदायिक विज्ञान असे नवीन नामांकन करण्यात आले असल्याचे व सदरचे नामांकन स्विकारण्याबाबत यापूर्वीही राज्यशासनास कळविण्यात आले असल्याचे भारतीय कृषि अनुसंधान परिषद,नवी दिल्ली यांनी कळविले आहे.

त्यानुषंगाने संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय,मुंबई व संचालक,आरोग्य सेवा, सार्वजनिक आरोग्य विभाग,पुणे यांना बी.एससी (ऑनर्स) गृह विज्ञान व बी.एससी (ऑनर्स) सामुदायिक विज्ञान या दोनही पदव्या समान असल्याने, बी.एससी (ऑनर्स) सामुदायिक विज्ञान या पदवीधारक उमेदवारांना संचालनालयातील बी.एससी (ऑनर्स) गृह विज्ञान ही पदवी शैक्षणिक पात्रता आहे, अशा पदांच्या भरतीप्रक्रियेत नोकरीच्या संधी उपलब्ध करुन द्याव्यात,असे कळविले होते. तथापि, त्यांच्याकडून याबाबत दखल न घेतली गेल्याने, बी.एससी (ऑनर्स) सामुदायिक विज्ञान पदवी प्राप्त विद्यार्थ्यांना आहारतज्ञ या पदासाठीच्या नोकरीच्या संधी डावलल्या जात आहेत.

यास्तव, बी.एससी (ऑनर्स) गृह विज्ञान व बी.एससी (ऑनर्स) सामुदायिक विज्ञान या दोनही पदव्या एकच असल्याबाबत शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्यातील चारही कृषि विद्यापीठातंर्गत शिकविण्यात येणाऱ्या बी.एससी गृह विज्ञान /B.Sc. Home Science, बी.एससी (ऑनर्स) गृह विज्ञान/B.Sc.(Hons.) Home Science, बी.एससी (ऑनर्स) सामुदायिक विज्ञान /B.Sc. (Hons.) Community Science या सर्व अभ्यासक्रमाच्या पदव्या एकच असल्याने, बी.एससी (गृह विज्ञान)/B.Sc. (Home Science) पदवी प्राप्त उमेदवारांना भरती प्रक्रियेत ज्या नोकरीच्या संधी उपलब्ध होत्या, त्या बी.एससी (ऑनर्स) गृह विज्ञान/B.Sc.(Hons.) Home Science व बी.एससी (ऑनर्स) सामुदायिक विज्ञान/B.Sc. (Hons.) Community Science पदवीप्राप्त उमेदवारांना उपलब्ध राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०२१३१६०४४२९९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E5448349O119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2025.02.13 16:06:28 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप-मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक , मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे.
१२.सदस्य सचिव तथा महासंचालक,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
१३.कुलगुरु (चारही कृषि विद्यापीठे).
१४.कुलसचिव (चारही कृषि विद्यापीठे).
१५.संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय,मुंबई
१६. संचालक, आरोग्य सेवा, सार्वजनिक आरोग्य विभाग,पुणे.
१७.कार्यासन ७-अे (निवडनस्ती).